राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पूरक कोकमठाण पाणी पुरवठा योजना ता. कोपरगाव,जि. अहमदनगर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१४ / प्र.क्र.११९ / पा.पु.०९

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ०९ जुलै २०१५

वाचा -

१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापाधो१२०८/प्र.क्र.५२/पा.पु.०७ दि.९ ऑक्टोबर २०१३

२) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबत शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/ पापु-०७ दि.९.७.२०१४

३ ) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२ /पापु-०७ दि. ९.७.२०१४

४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापायो १११४ / प्र.क्र.५२/पापु-०७ दि. १७.१०.२०१४

५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीच्या अधिकाराबाबत शासन परिपत्रक क्र ग्रापापु १११५/प्रक्र२२/पापु ०७ दि. १६.२.२०१५

६) मुख्य अभियंता (नावग्रा), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे पत्र क्र मजीप्रा /मु.अ(नावग्रा)/तांशा-२/कोकमठाण/१९/३१८३ दि. ५.९.२०१४

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर यांचे पत्र क्र.कार्या ३/प्रशा ३/२०३ सन २०१४ दि. २२.१२.२०१४

**प्रस्तावना -**

कोकमठाण ता.कोपरगाव, जि.अहमदनगर या गावाची मूळ योजना कोकमठाण गावाची सन २०३० ची प्रकल्पित लोकसंख्या गृहीत धरून करण्यात आली होती. परंतु गावांतर्गत जंगली महाराज आश्रम व जनार्दन महाराज आश्रम या ठिकाणी दर्शनास येणा-या भाविकांच्या संख्येत मोठया प्रमाणात वाढ झाल्याने मूळ योजना अपुरी पडत आहे. त्यामुळे तरंगती लोकसंख्या गृहीत धरून ४० लिटर्स प्रतिमाणशी / प्रतिदिवशी याप्रमाणे पूरक कोकमठाण योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( नागरी व ग्रामीण ) ठाणे यांनी दि.१९/०८/२०१४ अन्वये तांत्रिक मान्यता दिली आहे. सदरहू योजनेचा दरडोई खर्च विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे व सदर योजनेची किंमत रु.७.५० कोटी पेक्षा जास्त असल्याने सदर योजनेस मान्यता देण्याचा प्रस्ताव जिल्हा परिषदेने शासनास सादर केला आहे. त्यानुसार वाढीव दरडोई खर्च असलेल्या सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

वरीलबाब विचारात घेवून कोकमठाण ता. कोपरगाव , जि. अहमदनगर या पूरक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.३५५५/- दरडोई खर्च असल्याने सदर पाणी पुरवठा योजनेच्या रु.८,५५,१०,९४०/- (रु.आठ कोटी पंचावन्न लाख दहा हजार नऊशे चाळीस फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ९/७/२०१४ च्या शासन निर्णयाव्दारे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पुर्णत : रदद करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहिल.

३. सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणा मार्फत करण्यात येईल. योजना पूर्ण झाल्यानंतर ती किमान १ वर्ष चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. त्यानुसार योजना पूर्ण झाल्यावर १ वर्ष पर्यत सदर योजना कंत्राटदारामार्फत चालविण्यात येईल अशी अट करारनामा करताना करारनाम्यात घालण्यात यावी व त्यानंतर कोकमठाण ग्रामपंचायत / पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांना हस्तांतरीत करण्यात यावी. योजना यशस्वीरित्या पूर्ण झाली आहे याची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होवून चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती / संदर्भाधीन अनु क्र. ४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावी.

२. सदर योजनेची अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र. ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. योजना चालविणे, योजनेची देखभाल व दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतीने योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी व कालपरत्वे त्यात वाढ करण्यात यावी. सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर यांनी ग्रामसभेव्दारे करावी. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४. योजनेमध्ये १००% घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा. तसेच १०० % मिटरींग करण्यात यावे.

५. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६.गांव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

८. योजनेतील कामे टप्प्याटप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत

९. जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाच्या परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येवू नयेत.

१०.योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामस्थांना सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरुवात करावी.

११.सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांअतर्गत मार्गदर्शक सुचनाची व प्रचलित अटीची पुर्तता करण्यात यावी.

१२. **सदर योजना सन २०१५-१६ च्या कृति आराखडयात असल्याने कृति आराखडा मंजूरीच्या व निधीची तरतूद उपलब्ध असल्याच्या अटीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे**.निधी उपलब्ध झाल्याशिवाय योजनेच्या निविदा बोलविण्यात येवू नयेत.सदर योजनेची कामे निधीच्या उपलब्धतेनुसार करण्यात यावीत.

४. या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या केंद्र व राज्य निधीमधून भागविण्यात यावा..

५ हा शासन निर्णय, शासन निर्णय क्र. ग्रापाधो १२०८/प्र.क्र.५२/पा.पु.०७ दि.९ ऑक्टोबर २०१३ अन्वये प्रशासकीय विभागास देण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०८१६४९५३५८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.07.09 14:53:27 +05'30'

**सु.दे.आंबेकर**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१)मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) सर्व मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य

३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
६) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
७) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१०) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
११) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वी.सहा. मंत्रालय, मुंबई.
१२) मुख्य अभियंता (ना व ग्रा ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन बेलापूर, नवी मुंबई.
१५) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, समन्वय व सनियंत्रण कक्ष, नाशिक
१६) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. (ना. व ग्रा.) योजना मंडळ, अहमदनगर.
१७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना. व ग्रा. योजना विभाग, संगमनेर
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, अहमदनगर.
१९) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास कक्ष, अहमदनगर
२०)कार्यासन पापु ०४,०६,१३,१७,१८ व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई
२१) निवड नस्ती पापु ०९